सन २०१४-१५ या वित्तीय वर्षासाठी ग्रामीण
तसेच नागरी भागात पिण्याच्या पाण्याच्या
टंचाई निवारणार्थ घेण्यात आलेल्या
उपाययोजनांवरील खर्च भागविण्यासाठी
अनुदान वितरीत करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः टंचाई** २०१४/**प्र.क्र.**५२/**पापु** १४
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**तारीखः** १५ **डिसेंबर, २०१४**

**वाचा :-**

१) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. टंचाई ३०९९/प्र.क्र.१३/पापु १४, दिनांक १ फेब्रुवारी, १९९९.
२) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. टंचाई २००८/प्र.क्र. १४९/पापु १४, दिनांक २१ ऑगस्ट, २००९.
३) शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक टंचाई २०१३/प्र.क्र. २१२/पापु १४ दिनांक ८.५.२०१२
४) शासन परिपत्रक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक टंचाई २०१३/प्र.क्र. ४१८/पापु १४, दिनांक ४.१.२०१४
५) शासन परिपत्रक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक टंचाई २०१३/प्र.क्र. ४८/पापु १४, दिनांक ६.५.२०१४
६) **शासनाचे समक्रमांकाचे दिनांक १२.०५.२०१४, २९.५.२०१४, ३०.६.२०१४, ५.७.२०१४, २२.७.२०१४ १०.११.२०१४ व दिनांक** २४.११.२०१४ **चे शासन निर्णय**
७) **शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक एससीवाय-०४/२०१३/प्र.क्र. ७७/म-११, दिनांक ८.५.२०१४**
८) **शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्रमांक एससीवाय-०५/२०१४/प्र.क्र. ५८/म-११, दिनांक ५.७.२०१४ व दिनांक ९.१२.२०१४**
९) **विभागीय आयुक्त, नाशिक यांचे क्रमांक लेखा/कक्ष/२/नै.आ./कावि/१४८२८ दिनांक १३.८.२०१४ चे पत्र**

**प्रस्तावना :-**

पिण्याच्या पाणी टंचाई निवारण कार्यक्रमांतर्गत ग्रामीण/नागरी भागात पाणी टंचाई निवारणाच्या उपाययोजनांवरील खर्च महसूल व वन विभागाच्या “मागणी क्र. सी-६, २२४५-नैसर्गिक आपत्तीच्या

निवारणासाठी सहाय्य, ०१-अवर्षण, १०२ - पिण्याच्या पाण्याचा पुरवठा, ९१-राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकानुसार खर्च, (९१) (०१) पिण्याच्या पाण्याच्या आकस्मिक निकडीचा पुरवठा (२२४५००९३) (दत्तमत) (वेतनेत्तर)-३१, सहाय्यक अनुदाने" व मागणी क्र. सी-६, २२४५-नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०१- अवर्षण, १०२-पिण्याच्या पाण्याचा पुरवठा, (९२), राज्य आपत्ती प्रतिसाद निधीच्या मानकाव्यतिरिक्त खर्चए (९२) (०१) पिण्याच्या पाण्याचा आकस्मिक निकडीचा पुरवठा (२२४५२१८५) (दत्तमत) (वेतनेत्तर) - ३१ सहाय्यक अनुदाने अंतर्गत या उपलेखाशिर्षाखाली या विभागाकडे वर्ग केलेल्या निधीतून भागविण्यात येतो. सन २०१४-१५ या चालू वित्तीय वर्षात महसूल व वन विभागाने पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ घेण्यात येणाऱ्या उपायसोजनांवरील उपलेखाशिर्ष २२४५ २१८५ अंतर्गत वर्ग केलेल्या रु. ६५००.०० लक्ष (रु. पासष्ट कोटी फक्त) पैकी रु. ६१५०.५१ लक्ष (रु. एकसष्ट कोटी पन्नास लाख एकावन्न हजार फक्त) इतका निधी संबंधित विभागीय आयुक्तांना वितरीत करण्यात आला आहे. उर्वरित रु. ३४९.४९ लक्ष इतका निधी वित्त विभागाच्या आदेशानुसार महसूल व वन विभागास या विभागाद्वारे समर्पित करण्यात आलेला आहे. तसेच, महसूल व वन विभागाने संदर्भ क. ८ च्या शासन निर्णयान्वये उपलेखाशिर्ष २२४५ ००९३ अंतर्गत रु. १०६१८.०० लक्ष (रु. एकशे सहा कोटी अठरा लक्ष पक्त) इतका या विभागाकडे वर्ग केलेला निधी विभागीय अयुक्तांना वितरीत करण्यात आलेला आहे. आता या विभागाच्या मागणीप्रमाणे पेयजल टंचाई निवारणार्थ घेण्यात येणा-या उपाययोजना करीता दिनांक ९.१२.२०१४ च्या शासन निर्णयान्वये महसूल व वन विभागाने या विभागाकडे वर्ग करण्यात आलेल्या निधीपैकी रु. २२५.०२ लक्ष इतका निधी विभागीय आयुक्त, नाशिक यांना त्यांच्या संदर्भ क्रमांक ९ च्या पत्रात केलेल्या मागणीस अनुसरुन वितरीत करावयाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय:-

ग्रामीण/नागरी भागात पेयजल टंचाई निवारणार्थ शासनाने विहित केलेल्या निकषानुसार नाशिक या विभागात पिण्याच्या पाण्याच्या टंचाई निवारणार्थ राबविलेल्या/राबविण्यात येणाऱ्या उपाययोजनांवरील खर्च भागविण्यासाठी रु. २२५.०२ लक्ष (रु. दोन कोटी पंचवीस लक्ष दोन हजार फक्त) इतका निधी विभागीय आयुक्त,नाशिक यांना संदर्भ क्र. ५ येथील शासन निर्णयामध्ये विहित केलेल्या अटी व शर्ती व खालील अटींच्या अधीन राहून अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीद्वारे मंजूर व मुक्त करण्यात येत आहे.

१) विभागीय आयुक्तांनी या विभागाकडे निधीची मागणी नोंदवितांना संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयात नमूद केलेल्या विहित विवरणपत्रात उपाययोजनानिहाय निधीची मागणी नोंदविण्यात यावी. तथापि, विभागीय आयुक्तांनी **सदर निधी जिल्हाधिकारी यांना वितरित करतांना उपाययोजनानिहाय निधी वितरित करण्याची दक्षता घ्यावी.**

२) विभागीय आयुक्तांकडे यापूर्वी शिल्लक असलेल्या निधीतून प्रलंबित देयकावरील खर्च भागविण्याची परवानगी देण्यात येत आहे.

३) **विभागीय आयुक्तांनी यापुढे निधीची मागणी करताना न चुकता जिल्हानिहाय चालु कामांची व प्रलंबित देयके स्वतंत्ररित्या दर्शवावी व प्रलंबित देयकांची (असल्यास) अंतिमतः मागणी तात्काळ सादर करावी. तसेच करण्यात येणा-या उपाययोजनांचे स्वरुप व कालावधी स्पष्टपणे नमुद करावा. अन्यथा अशी तुटीपुर्ण मागणी विचारात घेतली जाणार नाही याची नोंद घ्यावी.**

४) सदर शासन निर्णयानुसार टँकरद्वारे /पिण्याच्या पाणी पुरवठा करण्यासाठीच्या उपाययोजनांकरिता जो निधी देण्यात आला आहे त्यातून देयके अदा करतांना टँकर जी.पी.एस. प्रणाली बसविलेली असणे व जी. पी. एस. प्रणालीवर ज्या टँकरच्या फेऱ्याची नोंद होईल त्याच फेऱ्या देयकाकरिता अनुज्ञेय राहतील. **ज्या पाणी पुरवठा करणाऱ्या टँकरवर जी.पी.एस. प्रणाली किंवा जी.पी.एस. प्रणाली बंद असल्याकारणाने टँकर वाहतूक धारकाने टँकरच्या फेऱ्या झाल्याचा दावा केला असल्यास अशा फेऱ्या बनावट ठरतील व त्यासाठी सदर अनुदान अनुज्ञेय राहणार नाही. मात्र, ज्या टँकर धारकांशी झालेले करार दिनांक ४.१.२०१४पूर्वी करण्यात आले असतील त्यांची देयके अदा करतांना सदर अट लागू राहणार नाही.**

५) विभागीय आयुक्तांकडे सोपविलेल्या निधीचा विनियोग करतांना सदर निधी ज्या प्रयोजनासाठी वर्ग करण्यात आला आहे त्याचा त्याच प्रयोजनासाठी वापर होत आहे तसेच निधीचे वाटप करतांना संबंधित कामासाठी पूर्वी निधी वितरित करण्यात आला नाही याची खातरजमा विभागीय आयुक्त यांनी करावी. तसेच ज्या प्रयोजनासाठी निधी वितरित करण्यात आला आहे, त्याबाबतची जिल्हानिहाय भौतिक प्रगतीची माहिती विभागीय आयुक्त यांनी शासनाकडे दर महिन्यास मासिक खर्चाच्या अहवालासोबत सादर करावी. निधीच्या वाटपाचे लेखे, अभिलेख विहित कार्यपध्दतीनुसार अनुदान आहरीत व वितरित करणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर अद्ययावत ठेवण्यात यावे. त्याचप्रमाणे दरमहा होणाऱ्या प्रत्यक्ष खर्चाची माहिती पुढील महिन्याच्या ५ तारखेपर्यंत एकत्रितरित्या शासनास सादर करावी. दर तीन महिन्यांनी झालेल्या खर्चाची, महालेखाकार कार्यालयात नोंदविण्यात आलेल्या खर्चाशी पडताळणी करुन त्याबाबतचे विहित प्रमाणपत्र या विभागाकडे तात्काळ सादर करावे. तसेच कोणत्याही परिस्थितीत मंजूर निधीच्या मर्यादेपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता नियंत्रक अधिकाऱ्याने घ्यावी. वितरित करण्यात आलेल्या अनुदानातून जर काही रक्कम खर्ची पडणार नसेल तर ती रक्कम विहित वेळेत शासनास प्रत्यार्पित करण्यात यावी.

६) याबाबतचा खर्च "मागणी क्र. सी-६, २२४५ - नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य, ०१ - अवर्षण, १०२ - पिण्याच्या पाण्याचा पुरवठा, ९१ - राज्य आपत्ती प्रतिसादर निधीच्या मानकानुसार खर्च, (९१) (०१) पिण्याच्या पाण्याचा आकस्मिक निकडीचा पुरवठा (२२४५००९३) (दत्तमत) (वेतनेत्तर)-३१, सहाय्यक अनुदाने" या उपलेखाशीर्षामध्ये भागवावा व त्याखाली अंतिमत: खर्ची टाकण्यात यावा.

७) आहरण व संवितरण अधिकाऱ्यांनी कोषागार/उपकोषागार अधिकारी यांजकडे पाठविण्यात येणाऱ्या व बिलासोबत जोडल्या जाणाऱ्या कॉम्प्युटर स्लीपमध्ये गौण/उपलेखाशिर्षाचा संगणक सांकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा. तसेच कोषागारातून/उपकोषागारातून आहरीत केलेल्या रक्कमेचा अहवाल शासनास सादर करावा.

८) हे आदेश, वित्त विभागाच्या मान्यतेने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ५९८/२०१४/व्यय-९, दिनांक ९.१२.२०१४ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन हे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१२१२१११५२३४८२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KUMATGI RAJENDRA B

Digitally signed by KUMATGI RAJENDRA B
DN: CN = KUMATGI RAJENDRA B, C = IN, S = Maharashtra, O = Govt Of Maharashtra, OU = Water Supply and Sanitation
Date: 2014.12.15 17:50:25 +05'30'

**(राजेंद्र कुमटगी)**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखाकार, (लेखा व परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
२. महालेखाकार, (लेखा व परिक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर.
३. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव (२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव (ग्रा.वि.), ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, (म.व पु.) महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.

८. मा.प्रधान सचिव, पाणी पुरवठा स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक,
९. उप सचिव /पापु-१४, पाणी पुरवठा स्वच्छता विभाग, यांचे स्वीय सहायक,
१०.विभागीय आयुक्त, नाशिक .
११.पापु - १४ संग्रहासाठी